GR-200408021500400१-१२०१

**यशवंत ग्राम समृध्दी योजना.**

**लेखा परिक्षणाबाबत.**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.यग्रावि-२००३/प्र.क्र.६८८/पं.रा.६(४७)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२०
दिनांक : १७ मार्च, २००४.

**वाचा :** १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.यग्रावि-२००१/प्र.क्र.१९४/ पं.रा.६ (४७), दिनांक २७ ऑगस्ट, २००२.

२)शासन शुध्दीपत्रक,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.यग्रावि-२००१/प्र.क्र.१९४/ पं.रा.६ (४७), दिनांक ११ ऑक्टोबर, २००३.

३)शासन शुध्दीपत्रक,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.यग्रावि-२००१/प्र.क्र.१९४/ पं.रा.६ (४७), दिनांक ४ मार्च, २००३.

**प्रस्तावना :**

ज्यांच्यासाठी योजना राबवावयाच्या आहेत त्यांच्या, म्हणजेच गांवक-यांच्या सहभागाने व निर्णय प्रक्रियेत त्यांना सक्रीय केल्यास योजना यशस्वी होण्यास मदत होईल व लोकशाहीचे बीज तसेच राज्यातील विकास कामांची माहिती प्रत्यक्षात गांवापर्यंत पोहोचेल व ज्या कामांची खरोखरच गरज आहे व जे काम प्राधान्याने करणे आवश्यक आहे असे काम गांव पातळीवर घेऊन ख-या अर्थाने गावामध्ये लोकांच्या सहभागातून ग्राम समृध्दी करावी या उद्देशाने, सन २००२-२००३ या आर्थिक वर्षापासून राज्यात यशवंत ग्राम समृध्दी योजना सुरु करण्यांत आली.

त्यानुषंगाने दिनांक २७ ऑगस्ट, २००२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यांत आला. यशवंत ग्राम समृध्दी योजने अंतर्गत शासनाकडून प्राप्त होणारा निधी या योजने व्यतिरिक्त वापरला जाऊ नये म्हणून या योजनेसाठी पंचायत समिती व ग्राम पंचायत स्तरावर स्वतंत्र खाते उघडून या योजनेचा स्वतंत्र हिशोब ठेवण्यांत यावा असे आदेश शासनाकडून निर्गमित करण्यांत आले आहेत. सदर योजनेच्या लेखा परिक्षणाबाबत स्पष्ट आदेश निर्गमित करण्याची विनंती मुख्य लेखा परिक्षा, स्थानिक निधी लेखा यांनी शासनास केली आहे.

**शासन निर्णय :**

यशवंत ग्राम समृध्दी योजने अंतर्गत शासनाकडून निधी प्रथमत: जिल्हा परिषदेकडे प्राप्त होते व तो जिल्हा निधीमध्ये ठेवून शासन मानकानुसार पंचायत समितींना वितरीत करावयाचा आहे. मात्र पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावर प्राप्त होणारा निधी अन्य बाबीवर वापरता येऊ नये यासाठी व तो याच योजनेसाठी वापरण्यात यावा या उद्देशाने सदर निधी स्वतंत्र खाते उघडून त्यात ठेवण्यांत यावा असे आदेशित करण्यांत आले आहे.

जिल्हा परिषद व पंचायत समिती स्तरावर सदर निधीचे हस्तांतरण, योजनेच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार झाले काय याची तपासणी/लेखा परिक्षण जिल्हा

परिषदेच्या लेखा परिषणाबरोबर स्थानिक निधी लेखा परिक्षण विभाग व महालेखापाल यांनी करावयाचे आहे.

ग्रामपंचायत स्तरावर सदर योजनेचा निधी खर्च होणार आहे. स्वतंत्र बँक लेख्यामध्ये जरी हा निधी ठेवला तरी सदर योजना ही राज्य शासनाची योजना असल्याने सदर निधी हा ग्राम निधीचाच भाग आहे. तेव्हा नियमित ग्राम निधीच्या लेखा परिक्षणाबरोबर या योजनेचेही लेखा परिक्षण करण्याचे आहे. सदर योजनेचे लेखा परिक्षण स्वतंत्र घटक समजण्यात येऊ नये. तरी स्थानिक निधी लेखापरिक्षण विभागाने ग्राम पंचायत लेखा परिक्षणामध्ये सदर योजनेचे लेखा परिक्षण करण्याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(कुंदा गोसावी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
१) महालेखापाल (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२) महालेखापाल (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
३) संचालक, लेखा व कोषागारे, नविन प्रशासन भवन, मुंबई
४) सर्व विभागीय आयुक्त,
५) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांच्या प्रतीसह)
७) उप मुख्य लेखा परीक्षक (स्थानिक निधी लेखा), मुंबई, पुणे,नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
९) सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी
१०) वित्त विभाग, अर्थसंकल्प-१६/व्यय-१५/अर्थोपाय-१६, मंत्रालय, मुंबई ३२.
११) नियोजन विभाग, का.क्र.१४४३, मंत्रालय, मुंबई ३२.
१२) कार्यासन क्र.वित्त-१ (२९), वित्त-४, योजना-७(कार्यासन ३५),
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१३) अवर सचिव, समन्वय कक्ष (३ प्रती) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय,मुंबई३२
१४) निवड नस्ती, का.क्र.पंरा ६(४७), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.